**वन प्रशिक्षण शाळा व महाविद्यालयाचा विस्तार व नवीन वन शिक्षण वृत्ताची स्थापना या योजनेतर योजनेखाली ३ अस्थायी पदांना सन २०२२-२०२३ मध्ये मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- एफडीएम २०२२/प्र.क्र.१९/फ-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- २३ मार्च, २०२२

**वाचावे :-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९ व दि.२१.०९.२०२१.

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक- एफडीएम २०२१/प्र.क्र.२७/फ-२ दि. ३०/०९/२०२१

३) उप वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांचे पत्र क्र.जा.क्र. कक्ष-३/ योजनेत्तर/प्र.क्र.१७ (२१-२२)/२५७, दि.०९/०२/२०२२

४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.२२/०२/२०२२

**शासन निर्णय :-**

वन प्रशिक्षण शाळा व महाविद्यालयाचा विस्तार व नविन वन शिक्षण वृत्ताची स्थापना या योजनेतर योजनेखाली संदर्भ क्र.२ येथील दि. ३०/०९/२०२१ च्या शासन निर्णयान्वये ३ अस्थायी पदांना सन २०२१-२२ मध्ये दि.०१.०९.२०२१ ते दि.२८.०२.२०२२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात आली होती. उप वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांनी संदर्भ क्र.३ येथील दि.०९.०२.२०२२ रोजीच्या पत्रान्वये सन २०२२-२३ मध्ये सदर ३ अस्थायी पदांना दि. ०१.०३.२०२२ ते दि.२८.०२.२०२३ पर्यंत पुढे चालू ठेवण्याबाबत शासनास प्रस्ताव सादर केला आहे.

२. खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आलेली ३ अस्थायी पदे वन विभागाच्या मंजूर आकृतीबंधात समाविष्ट असल्याने या ३ अस्थायी पदांना वित्त विभागाच्या संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णय दि.२२.०२.२०२२ च्या अधिन राहून दि.०१.०३.२०२२ ते ३१.०८.२०२२ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर मुदत वाढ महसूल व वन विभागाने संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या आकृतीबंधात या पदांचा समावेश आहे या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **पदनाम** | **वनप्रशिक्षण संस्थेचे नाव** | **पदसंख्या** |
|---|---|---|---|
| १. | सहायक वनसंरक्षक | वनप्रशिक्षण संस्था, चिखलदरा | १ |
| २. | सहायक वनसंरक्षक | दा.चौ. वनप्रशिक्षण संस्था, पाल | १ |
| ३. | सहायक वनसंरक्षक | वनप्रशिक्षण संस्था, जालना | १ |
| | | **एकूण** | **३** |

३. या पदांवर होणार खर्च -प्रधान शिर्ष २४१५ कृषीविषयक संशोधन व शिक्षण (योजनेत्तर) ०६ वनीकरण, २७७ शिक्षण, (००) (००) (०१) वनक्षेत्रपालांसहीत वनाधिकाऱ्यांचे प्रशिक्षण ०१ वेतन (२४१५ ०४८२) ०१ वेतन या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ मध्ये उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात येईल.

४. प्रस्तुत शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. शासन निर्णय,वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.२२.०२.२०२२ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२३११०३१९३११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SUNIL PANDURANG PANDHARE

Digitally signed by SUNIL PANDURANG PANDHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7f874792415b92ba519384cacb41b53a89cf93dbd96d4be1f7d97fb6326eed47, pseudonym=E356063E1710100620E953749C8FA6F85E9A154E, serialNumber=8B7DC58E83C9774E4419A7AEEAC77EAE7CDEA272D759DFB29451BCFE7E3F04C9, cn=SUNIL PANDURANG PANDHARE
Date: 2022.03.23 11:04:58 +05'30'

**( सुनिल पांढरे )**
उप सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रतिलिपी** :-

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) सर्व मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव / प्रादेशिक).
५) मुख्य वनसंरक्षक, वनशिक्षण वृत्त, पुणे.
६) संचालक, वनरक्षक प्रशिक्षण संस्था, चिखलदरा/जालना.
७) संचालक, दादासाहेब चौधरी वनप्रशिक्षण संस्था, पाल.
८) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
९) वित्त विभाग, व्यय १०/अर्थसंकल्प-६/वित्तीय सुधारणा, मंत्रालय, मुंबई.
१०) कार्यासन अधिकारी, ब-१ महसूल व वन विभाग, मंत्रालय मुंबई.
११) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.